आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जिल्हास्तर व राज्यस्तर योजनांकरीता नियतव्यय वाटप सुत्रात बदल करणे व त्यानुषंगाने जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेतंर्गत निधी अर्थसंकल्पीत करणेबाबतची सुधारित कार्यपध्दती...

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टिएसपी-२०१७/प्र.क्र.२१९/का.६**

मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२

**तारीख: २५ ऑक्टोबर,२०१८.**

**वाचा -**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. आउयो-१०९१/प्र.क्र.११/का.६, दि.२१.०९.१९९२.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.टिएसपी-२००६/प्र.क्र.४१/का.६, दि.०९.०१.२००७.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.टिएसपी-२००८/प्र.क्र.६/का.६, दि.१६.१२.२००९.
४) आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक, क्र. टिएसपी-२०१५/प्र.क्र.१७४/का.६,दि. १८.०९.२०१५.
५) आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक, क्र. टिएसपी-२०१६/प्र.क्र.२३३/का.६, दि. १.०२.२०१७.
६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. टिएसपी-२०१७/प्र.क्र.२१९/का.६, दि. १३.१०.२०१७.

**प्रस्तावना -**

वित्त विभागाच्या शासन निर्णय दि.२७.०१.२०१७ नुसार सन २०१७-१८ पासून योजनेतर व योजनांतर्गत खर्चाचे एकत्रिकरण झाल्याने योजनेतर व योजनांतर्गत असे यापुर्वी दर्शविले जाणारे विभाजन बंद करण्यात आले असून अर्थसंकल्पीय खर्चाचे अनिवार्य खर्च (Committed Expenditure) व कार्यक्रमांवरील खर्च (Scheme Expenditure) असे विभाजन दर्शविण्यात येत आहे . यानुसार यापुर्वीचा मुळ आस्थापना विषयक खर्च वगळता इतर योजनेतर योजनांवरील खर्च कार्यक्रमावरील खर्चामध्ये (Scheme Expenditure) समाविष्ट केला आहे; यामध्ये प्रामुख्याने शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, शासकीय वसतीगृहे, शिष्यवृत्ती/निर्वाह भत्ता इ. आदिवासी विकास विभागाच्या प्राधान्यक्रमाच्या योजना असून अशा महत्वाच्या योजनांतर्गत बांधील खर्चाकरीता मोठ्या प्रमाणावर प्राधान्याने निधी उपलब्ध करण्याची गरज असते. आदिवासी उपयोजनेतंर्गत सन २०१८-१९ पूर्वी जिल्हास्तर : राज्यस्तर योजनांकरिता ६०: ४० या प्रमाणात नियतव्यय वाटप करणे क्रमप्राप्त असल्यामुळे विभागाच्या उपरोक्त प्राधान्यक्रमाच्या योजनांकरीता मागणीच्या प्रमाणात एकाच स्तरावरुन तरतूद उपलब्ध करण्यास मर्यादा येत असल्याने या योजनांना प्रामुख्याने राज्यस्तरावरुन

तरतूद करुन जिल्हास्तरावरुन पूरक स्वरुपात निधीची तरतूद करण्यात येत आहे. तथापि, अशा द्विरूक्तीमुळे आवश्यकतेनुसार वार्षिक निधीचे नियोजन करण्यास तसेच मागणीनुसार संबंधित कार्यालयास निधी वितरण करण्यास अडचणी उद्भवत असल्याचे निदर्शनास आले आहे. तसेच उपरोक्त योजनांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून पुर्णत: थेट लाभ हस्तांतरण प्रकीयेद्वारे (DBT) विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात विहित रक्कम जमा करण्याचे धोरण विभागाने स्विकारले आहे. यानुसार मध्यवर्ती एकाच ठिकाणावरून विहित रक्कम थेट विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात वर्ग करणे आवश्यक असून त्याकरीता योजनांची तरतूद एकाच ठिकाणी राज्यस्तरावर होणे आवश्यक आहे. याशिवाय अशा बांधील स्वरूपाच्या योजनांकरीता जिल्हा वार्षिक उपयोजनेच्या नियतव्ययामधून मोठ्या प्रमाणात तरतूद करण्यात येत असल्याने जिल्हा वार्षिक उपयोजनेंतर्गत स्थानिक गरजेनुसार इतर विकासात्मक योजना राबविण्यास पुरेशा प्रमाणात निधी उपलब्ध करण्यास मर्यादा येतात. या सर्व बाबीं विचारात घेता राज्यस्तर व जिल्हास्तर द्विरूक्ती टाळण्यासाठी जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेतंर्गत "मागासवर्गीय कल्याण " या उपविकास शीर्षाखालील बांधील स्वरुपाच्या खर्चाच्या योजना राज्यस्तरावर वर्ग करण्याची आणि त्यानुषंगाने राज्यस्तर व जिल्हास्तर नियतव्यय वाटपाचे सुत्रात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासून सोबत जोडलेल्या परिशिष्टामधील जिल्हास्तरावरील योजना राज्यस्तरावर वर्ग करण्यात येत आहेत . यानुषंगाने पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

१) सदर योजनांकरीता यापुढे राज्यस्तरावरून तरतूद उपलब्ध करून देण्यात येईल, त्याकरिता जिल्हास्तरावरून कोणतीही तरतूद प्रस्तावित करण्यात येऊ नये.

२) सोबतच्या परिशिष्टामधील स्तंभ ५ मध्ये नमूद केलेल्या “राज्यस्तरावरील लेखाशिर्ष” मध्ये सदर योजनांचा खर्च भागविण्यात यावा.

३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सोबतच्या परिशिष्टातील नमूद योजनांवरील वार्षिक खर्चासाठी “राज्यस्तरावरील लेखाशिर्ष ” खाली एकत्रितपणे निधीची मागणी तसेच निधी वितरण करावे.

**२.** आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत आस्थापना तसेच शिष्यवृत्ती विषयक बांधील स्वरुपाच्या सोबतच्या परिशिष्टामधील जिल्हा योजना राज्यस्तरावर वर्ग केल्यामुळे सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासून सदर योजनांचा खर्च राज्यस्तरावरुन भागविण्यात येणार असल्याने आदिवासी घटक

कार्यक्रमास उपलब्ध होणारा वार्षिक नियतव्ययाचे पुढीलप्रमाणे नियोजन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत नियोजन/वित्त विभागाकडून प्राप्त होणा-या एकूण वार्षिक नियतव्ययापैकी आदिवासी विकास विभागाच्या आस्थापनाविषयक (वेतन व कार्यालयीन बाबी ) तसेच बांधील स्वरुपाच्या (साधन सामुग्री, आहार, शैक्षणिक दायित्व ) खर्चाच्या योजनांकरीता आवश्यक नियतव्यय वजा करून उर्वरीत इतर विकासात्मक योजनांकरिता शिल्लक राहणाऱ्या नियतव्ययामधून राज्यस्तर व जिल्हास्तर उपयोजनांकरिता नियतव्यय वाटप करण्यात यावा. इतर विकासात्मक नियतव्ययाचे वाटप पुढीलप्रमाणे करण्यात यावे.

५% -पेसा ग्रामपंचायतींना थेट अनुदान,
५५%-राज्यस्तर आदिवासी घटक कार्यक्रम
४०%-जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रम.

२) जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन दि १३.१०.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या क्षेत्रनिहाय नियतव्यय वाटपाची टक्केवारी रद्द करण्यात येत असून सन २०१९-२० पासून “मागासवर्गीय कल्याण (विशेष क्षेत्र)” या उपविकास क्षेत्राचा समावेश “गाभा क्षेत्रात” करण्यात यावा. तसेच “नाविन्यपूर्ण योजना” हे वेगळे उपविकास क्षेत्र न दाखविता सदर क्षेत्राचा समावेश “बिगर गाभा क्षेत्रात” करण्यात यावा. त्यानुषंगाने गाभा क्षेत्र व बिगर गाभा अतंर्गत खालीलप्रमाणे उपविकास क्षेत्राचे वर्गीकरण निश्चित करण्यात येत असून त्याकरीता जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रमास मंजूर वार्षिक नियतव्ययाचे अनुक्रमे **किमान** ३/४ व **कमाल** १/४ याप्रमाणात वाटप करण्यात यावे .

| गाभा क्षेत्र (Core Sector) | बिगर गाभा क्षेत्र (Non Core) |
|---|---|
| १.मागासवर्गीय कल्याण (विशेष क्षेत्र) | १.नगर विकास |
| २. ग्रामविकास | २.पर्यटन व वन पर्यटन |
| ३.कृषी,फलोत्पादन, पशुसंवर्धन,मत्स्यसंवर्धन, वने | ३.सहकार व वस्त्रोद्योग |
| ४.शालेय शिक्षण, क्रीडा व युवक कल्याण, उच्च व तंत्र शिक्षण व कौशल्य विकास | ४.वैद्यकीय शिक्षण |
| ५. ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता | ५. जलसंपदा |

| गाभा क्षेत्र (Core Sector) | बिगर गाभा क्षेत्र (Non Core) |
|---|---|
| ६. आरोग्य | ६.रस्ते व पुल विकास,सार्वजनिक बांधकाम |
| ७. महिला व बालविकास- पोषण,अंगणवाडी बांधकाम | ७. उद्योग व उर्जा |
| ८.जलसंधारण/लघुपाटबंधारे. | ८.नाविण्यपूर्ण योजना, मुल्यमापन व सनियंत्रण |

३) सुधारित तरतुदी व्यतिरीक्त जिल्हा वार्षिक योजनेच्या कार्यपध्दतीबाबत दिनांक १३.१०.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील इतर तरतुदीं कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२९१२५६२१५९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.10.31 13:44:44 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. .राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय,मुंबई.
८. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१०.आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक
११.आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
१२.संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.

१३.सर्व अपर आयुक्त,आदिवासी विकास
१४.सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती
१५.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी
१८.सर्व सहसचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, आ.वि.वि, मंत्रालय,मुंबई.
१९.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

# परिशिष्ट

| अ.क्र | जिल्हास्तरावरून राज्यस्तरावर वर्ग करण्यात येत असलेल्या योजना | जिल्हा योजनेचे सन २०१७-१८ पूर्वीचे लेखाशिर्ष | जिल्हा योजनेचे उपशीर्ष | राज्यस्तरावरील लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | आश्रमशाळा समुह (टिएसपी) | २२२५ १५८२ | TT२४०००५ | २२२५ डी७३४ |
| २ | आश्रमशाळा समुह (ओटिएसपी) | २२२५ २००३ | TT२४००१३ | |
| ३ | शासकीय आश्रमशाळेत इ. ११ वी व इ.१२ वी चे वर्ग उघडणे (टिएसपी) | २२२५ ३९४१ | TT२४००२५ | |
| ४ | शासकीय आश्रमशाळेत इ. ११ वी व इ.१२ वी चे वर्ग उघडणे (ओटिएसपी) | २२२५ ४०२४ | TT२४००२८ | |
| ५ | आश्रमशाळांमध्ये क्रीडास्पर्धांचे आयोजन करणे | २२२५ ई०१५ | TT२४०००३ | |
| ६ | मागासवर्गीय मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतीगृह (टिएसपी) | २२२५ १५५३ | TT२४०००४ | २२२५ डी७२५ |
| ७ | मागासवर्गीय मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतीगृह (ओटिएसपी) | २२२५ १९५६ | TT२४००१२ | |
| ८ | अनूसूचित जमातीकरिता स्वेच्छा संस्थांकडून चालविल्या जाणाऱ्या मुलभूत आश्रमशाळांकरिता सहाय्यक अनुदान देणे (टिएसपी) | २२२५ १६०६ | TT२४०००६ | २२२५ १२६८ |
| ९ | अनूसूचित जमातीकरिता स्वेच्छा संस्थांकडून चालविल्या जाणाऱ्या मुलभूत आश्रमशाळांकरिता सहाय्यक अनुदान देणे (टिएसपी) | २२२५ १६१५ | TT२४०००७ | |
| १० | अनूसूचित जमातीकरिता स्वेच्छा संस्थांकडून चालविल्या जाणाऱ्या मुलभूत आश्रमशाळांकरिता सहाय्यक अनुदान देणे (ओटिएसपी) | २२२५ २११२ | TT२४००१७ | |
| ११ | अनूसूचित जमातीकरिता स्वेच्छा संस्थांकडून चालविल्या जाणाऱ्या मुलभूत आश्रमशाळांकरिता सहाय्यक अनुदान देणे (ओटिएसपी) | २२२५ २०२१ | TT२४००१५ | |

| अ.क्र | जिल्हास्तरावरून राज्यस्तरावर वर्ग करण्यात येत असलेल्या योजना | जिल्हा योजनेचे सन २०१७-१८ पूर्वीचे लेखाशिर्ष | जिल्हा योजनेचे उपशीर्ष | राज्यस्तरावरील लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| | **शिष्यवृत्ती व निर्वाह भत्ता विषयक योजना** | | | |
| १२ | भारत सरकार शिष्यवृत्ती (टिएसपी) | २२२५ डी९४१ | TT२४००३४ | २२२५ डी९४१ |
| १३ | भारत सरकार शिष्यवृत्ती (ओटिएसपी) | २२२५ डी९५९ | TT२४००३५ | |
| १४ | वैद्यकीय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती | २२२५ डी९६८ | TT२४००३६ | २२२५ ३५२९ |
| १५ | आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क देणे (टिएसपी) | २२२५ १६५१ | TT२४०००८ | २२२५ ११२३ |
| १६ | आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क देणे (ओटिएसपी) | २२२५ २०५९ | TT२४००१६ | |
| १७ | आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क देणे (टिएसपी) | २२२५ १८३१ | TT२४०००९ | |
| १८ | आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क देणे (ओटिएसपी) | २२२५ २०१२ | TT२४००१४ | |
| १९ | व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यर्थ्यांना निर्वाह भत्ता देणे (ओटिएसपी) | २२२५ २२०१ | TT२४००१८ | २२२५ २२९१ |